**जामखेडी मध्यम प्रकल्प, ता. साक्री, जि. धुळे - तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- सुप्रमा-२०१४/( प्र.क्र. ८४/१४)/ म.प्र.**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**दिनांक :- १३ जून,२०१८.**

**संदर्भ:-** १) महाराष्ट्र शासन, पाटबंधारे विभाग, शासन निर्णय क्र.जेकेडी-१०८२/ १३६/ (२२/८२)/ जसअं-२.,दि. ०६/०३/१९८२.

२) महाराष्ट्र शासन, पाटबंधारे विभाग, शासन निर्णय क्र.जेकेडी-१०९२/ १२७८/ (२१७/९२)/ जसअं-२., दि. २८/१०/१९९२.

३) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचा महामंडळ निर्णय क्र.तापाविम/कासं/प्रवि-४/सुप्रमा/९/मप्र/१९९९, दि. ०६/०४/१९९९.

४) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचा महामंडळ निर्णय, क्र.तापाविम/काअ/प्रवि-४/सुप्रमा/२६/मप्र/२००४, दि. १६/०८/२००४.

५) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ,जळगांव यांचे पत्र क्र.मुअ/तापाविम/प्रशा-२/३७३५/२०१४ , दि. ०२/०८/२०१४.

६) अधीक्षक अभियंता व सदस्य सचिव, रा.तां.स.स, नाशिक यांचे पत्र क्र. रातांसस/जामखेडी म.प्र./३२७/२०१३, दि. १७/१२/२०१३

**प्रस्तावना:-**

जामखेडी मध्यम प्रकल्प हा तापी पाटबंधारे विकास महामंडळांतर्गत धुळे जिल्हातील साक्री तालुक्यातील नवेनगर गावाजवळ जामखेडी नदीवर बांधकामाधीन आहे. सदर प्रकल्पाचे माती धरण व डावा कालव्याचे काम पूर्ण झालेले असून वितरीकांचे काम पूर्ण करावयाचे आहे.

जामखेडी मध्यम प्रकल्पास १४.९५२ दलघमी पाणी उपलब्ध असून प्रकल्पीय पाणी साठा १३.२८ दलघमी आहे. धरणाचे काम सन २००२ मध्ये पूर्ण झालेला आहे. सदर योजने अंतर्गत साक्री तालुक्यातील १६ गावांचे २७५० हेक्टर सिंचन क्षेत्रास प्रत्यक्ष सिंचनाचा लाभ होणार असून सद्यस्थितीत २३५० हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ मिळत आहे. तसेच धरणात झालेल्या पाणी संचयामुळे परिसरातील पाणीपातळीत वाढ झाली आहे.

विषयांकित योजनेस संदर्भ क्र.१ नुसार रू. २.१८ कोटी (रूपये दोन कोटी अठरा लक्ष फक्त) इतक्या रकमेस मूळ प्रशासकीय मान्यता, संदर्भ क्र.२ नुसार सन १९९१-९२ चे दरसूचीवर आधारीत रू. ८.७२ कोटी (रूपये आठ कोटी बहात्तर लक्ष फक्त) इतक्या रकमेस नव्याने प्रशासकीय मान्यता, संदर्भ क्र.३ नुसार सन १९९८-९९ चे दरसूचीवर आधारीत रू. २६.९४ कोटी (रूपये सव्वीस कोटी चौ-यांन्नव लक्ष फक्त) इतक्या रकमेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता व संदर्भ क्र.४ नुसार सन २००२-०३ चे दरसूचीवर आधारीत रू. ३५.२७ कोटी (रूपये पस्तीस कोटी सत्तावीस लक्ष फक्त) इतक्या रकमेस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे संदर्भ क्र. ५ अन्वये सन २०११-१२ चे दरसूचीवर आधारीत रु. ५६.४४ कोटी किंमतिचा तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मान्यतेस्तव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावाची छाननी राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती, नाशिक यांनी करून संदर्भ क्र. ६ अन्वये कळविले आहे. सदर प्रकल्प अवर्षण प्रवण क्षेत्रातील आहे. प्रकल्पाचे लाभ व्यय गुणोत्तर ३.१० येत असून ही योजना आर्थिक मापदंडात बसतो.

सदर योजनेची द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता किंमत रु. ३५.२७ च्या तुलनेत तृतीय सुधारित प्रकल्प अहवालाची किंमत रु. २१.१६ कोटीने जास्त आहे. किंमत वाढीची प्रमुख कारणे पुढीलप्रमाणे आहेत :-

| **अ.क्र.** | **बाब** | **वाढ (रुपये कोटी)** |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १ | दरसूचीतील बदलामुळे | ५.७२ |
| २ | जास्त दराची निविदा स्विकृतीमुळे | १.३१ |
| ३ | भूसंपादनाच्या किंमतीतील वाढ | ८.६१ |
| ४ | अपूरी तरतूद | ७.३० |
| ५ | इतर कारणांमुळे (अनुषंगिक खर्चासह) झालेली वाढ | १.४३ |
| ७ | बचत | (-)३.२१ |
| | **एकुण वाढ** | **२१.१६** |

धुळे जिल्ह्यातील साक्री तालुक्यातील अवर्षण प्रवण, आदिवासी क्षेत्रातील २७५० हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने तसेच प्रकल्पाच्या दरसूचीतील वाढ, भूसंपादन किंमतीतील वाढ, अपूरी तरतूद इत्यादी कामांमुळे झालेली वाढ लक्षात घेऊन प्रकल्पाच्या तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्तावास मान्यता देणेचा प्रस्ताव शासनाचे विचाराधीन होता.

नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने सदर प्रस्ताव दि. १५/०२/२०१८ रोजी व्यय अग्रक्रम समितीच्या पुढे विचारार्थ ठेवला असता व्यय अग्रक्रम समितीने विषयांकित प्रकल्पाच्या द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्तावास मंजूरी दिली आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

शासन आता या निर्णयाव्दारे तापी खोऱ्यातील जामखेडी मध्यम प्रकल्प, ता.साक्री, जि. धुळे - या योजनेच्या सन २०११-१२ च्या दरसूचीवर आधारीत रु. ५६.४४ कोटी (रूपये छप्पन कोटी चौळेचाळीस लक्ष फक्त) इतक्या किंमतीच्या तृतीय सुधारित प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रु. ५०.५० कोटी (रुपये पन्नास कोटी पन्नास लक्ष फक्त) कामाप्रित्यर्थ व रु. ५.९४ कोटी (रुपये पाच कोटी चौ-यान्व लक्ष फक्त) आस्थापना व अनुषंगिक खर्चासाठी तरतूद आहे. सोबत उपशीर्ष निहाय सुधारित तरतुदींचा गोषवारा दिलेला आहे.

२.  या योजनेस प्रदान केलेली तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये अनुक्रमांक ०२/ २०१८ वर नोंदवण्यात आली आहे.

३.  सदर योजनेचे उर्वरित काम  नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय मान्यता तरतूदीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

४.  या योजनेच्या कामावर होणारा खर्च मागणी क्रमांक- आय-५, ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (०२) योजनांतर्गत, (०२)(०४) तापी पाटबंधारे विकास महामंडळाला भाग भांडवली अंशदान (४७०१ एच ७६३) या लेखाशिर्षाखाली खर्च टाकावा व त्याखालील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

५.  सदर तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

५.१)  सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वयी करण्याच्या विविध टप्यावर झालेल्या अनियमिततेस मान्यता गृहित धरता येणार नाही.

५.२) या प्रकल्पाबाबत चालू असलेल्या अथवा प्रस्तावित विभागीय चौकशीची कार्यवाही  पूढे चालू ठेवावी.

तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही.

५.३) आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करण्यात येऊ नये.

५.४) प्रलंबित भूसंपादनाची तरतूद भूसंपादन कायदा २०१३ अंतर्गत करण्यात यावी.

५.५) सदर योजनेच्या अपूरी तरतुदीमुळे वाढ झालेली असून याप्रकरणी अपूरे सर्वेक्षण करणा-या संबंधित अधिका-यांवर जबाबदारी निश्चित करण्यात यावी.

५.५) सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, CWC ची मार्गदर्शक तत्वे, वित्त अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती याची काटेकोरपणे अंबलबजावणी  करण्यात यावी.

५.६) सदर प्रकल्पाचे काम सु.प्र.मा. किंमतीच्या मर्यादेत व नियोजीत वेळेत पूर्ण करण्यात यावे.

६.  सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा, अनौपचारीक संदर्भ क्र. १३५/का.१४३४ दि. २१/०६/२०१७, वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. २१७/व्यय-१२, दि.१९/०९/२०१७ व दि. १५/०२/२०१८ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीतील  निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७.  सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी निर्गमित दिनांकापासून करण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०६१३१६५२१८७६२७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dharane Mallikarjun Irappa

Digitally signed by Dharane Mallikarjun Irappa
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42153c779eba7d6ca17364b6d37857b105b20a01d36c767c7ed1d7d278837bd7, cn=Dharane Mallikarjun Irappa
Date: 2018.06.13 16:55:18 +05'30'

**सहपत्र :- उपशीर्ष निहाय सुधारित तरतुदींचा गोषवारा**

**( म.ई.धरणे )**
शासनाचे उप सचिव

**प्रत, सहपत्रांसह :-**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
१२) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
१३) मुख्य अभियंता (द.व प्र) व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
१५) उपसचिव (मो.प्र-१/ मो.प्र-२/जसं/निवसं/सिंव्य/लाक्षेवि/लपा/जवि),यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) अधीक्षक अभियंता, धुळे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे.
१८) कार्यकारी अभियंता, लघू पाटबंधारे विभाग, धुळे.
१९) वित्त विभाग ( व्यय-१२/ अर्थ-०२/अर्थ-१०/व्यय-६ अ ), मंत्रालय, मुंबई.
२०) नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई.
२१) मध्यम प्रकल्प कार्यासन संग्रहार्थ.

## उपशीर्ष निहाय सुधारित तरतुदींचा गोषवारा

**जामखेडी मध्यम प्रकल्प, ता. साक्री , जि. धुळे - तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...**
**शासन निर्णय क्र. सुप्रमा-२०१४/(प्र.क्र.८४/१४)/म.प्र., दि.१३/०६/२०१८ चे सहपत्र.**

| अ.क्र. | उपशीर्ष | तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रक (रुपये कोटी) |
|---|---|---|
| १. | २. | ३. |
| १) | अ-प्राथमिक | ०.३७ |
| २) | ब-भूसंपादन | १०.५३ |
| ३) | सी-कामे | ९.९४ |
| ४) | डी-विमोचक | ०.५९ |
| ५) | इ-प्रपात | ०.०६ |
| ६) | एफ़-आरएचटी वर्क | ६.०६ |
| ७) | जी-ब्रिजेस | ०.८४ |
| ८) | एच-एस्केप | ०.०६ |
| ९) | के-इमारती | ०.४८ |
| १०) | एल-मातीकाम | १.७८ |
| ११) | एम-वृक्षारोपण | ०.०८ |
| १२) | ओ-संकिर्ण | ०.०६ |
| १३) | पी-देखभाल व दुरुस्ती | ०.२३ |
| १४) | क्यु - अवजारे व हत्यारे | ०.०६ |
| १५) | आर-दळणवळण | ०.४४ |
| १६) | यू- वितरिका | १८.९२ |
| | | |
| | **एकूण कामाप्रित्यर्थ** | **५०.५०** |
| | **आस्थपना व अनुषंगिक खर्च** | **५.९४** |
| | **एकूण** | **५६.४४** |